**शहर सर्व्हे क्र.८३२, फायनल प्लॉट क्र.१७३, भांबुर्डा, शिवाजीनगर, पुणे येथील प्रस्तावित नवीन शिक्षण आयुक्तालय बांधण्यासाठीच्या बांधकामाकरीता निधी वितरीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र.प्रशामा-२०२१/प्र.क्र.८१/२१/प्रशा-५**
चौथा मजला, विस्तारीत इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक : ३० मार्च, २०२२

वाचा:-१)शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. प्रशामा-२०२१/प्र.क्र.८१/२१/ प्रशा-५, दिनांक ६.१२.२०२१
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १७.३.२०२२
३) आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. आशिका२०२२/भांबुर्डा बांधकाम/ (आस्था-क१४३)/१६६९, दिनांक २३ मार्च,२०२२

प्रस्तावना -

शालेय शिक्षण विभागाच्या नावे अभिलिखित असलेली मौजे भांबुर्डा, शिवाजीनगर, तालुका पुणे शहर सिटी सर्व्हे नं. १७३/बी १ येथील ८३२७ चौ.मी. जमिनीपैकी ४१६४ चौ.मी. इतक्या जागेत शिक्षण आयुक्तालयाच्या इमारतीचे बांधकाम प्रस्तावित आहे. सदर इमारतीच्या बांधकामाकरीता शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ३० सप्टेंबर,२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.६४.२४ कोटी इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांनी सदर कामाच्या अंदाजपत्रकाचे फेर Recapitulation Sheet तयार करुन रु. ९०८४.३५ लक्ष इतक्या रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती केली होती.

२. दिनांक २९ नोव्हेंबर, २०२१ रोजी झालेल्या मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने रु. ८८.३४ कोटी इतक्या किंमतीच्या सुधारित प्रस्तावास सहमती दर्शविली आहे. उच्च स्तरीय सचिव समितीने दिलेल्या सहमतीनुसार प्रस्तावित बांधकामासाठी ८८.३४ कोटी इतक्या रक्कमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा शासन निर्णय दिनांक ६.१२.२०२१ रोजी निर्गमित करण्यात आला. आयुक्त शिक्षण कार्यालयाने संदर्भ क्र. ३ येथे नमूद दिनांक २३.३.२०२२ रोजीच्या पत्रान्वये रु.१७.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार शिक्षण आयुक्तालयाच्या बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे भांबुर्डा, शिवाजीनगर, तालुका पुणे शहर सिटी सर्वे नं. १७३/बी १ येथील ८३२७ चौ.मी. जमिनीपैकी ४१६४ चौ.मी. इतक्या जागेत शिक्षण आयुक्तालयाच्या बांधकामासाठी रुपये १०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात करण्यात येत आहे.

२. उपरोक्त बांधकामासाठीचा खर्च लेखाशिर्ष " ई-४, ४२०२ शिक्षण,क्रीडा कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१, सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण (००) (०४), उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे (४२०२ ६२२८)" अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.४१३/व्यय-५, दिनांक ३०.३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२२०३३०१९५७३९१७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE

Digitally signed by SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, pseudonym=EB81C64443B702FB77DC1591B2143DFF0994DDB2, serialNumber=557ABE7A7194EC5DDC74DF537D7D57A9DBDA20B1937A2E41983C35F6A38B6AD8, cn=SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
Date: 2022.03.30 20:00:40 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. जिल्हाधिकारी, पुणे
२. आयुक्त,(शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल , महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४. महालेखपाल महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर
५. उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, ३२
६. उप सचिव (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
८. वित्त विभाग व्यय-०५ कार्यासन मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती प्रशा-५